**केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) यांनी दाखल केलेली प्रकरणे चालविण्यासाठी मुंबई येथे ७,नागपूर ३ व पुणे, अमरावती येथे प्रत्येकी १ याप्रमाणे स्थापन केलेल्या एकूण १२ विशेष न्यायालयांच्या आस्थापनेवरील ६० अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : विशेन्या १३१८/प्र.क्र.६३/का-नऊ,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक: ११ मार्च, २०२०.

**पहा :-** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. विशेन्या-१३१८/प्र.क्र.६३/का.९, दि.२३.०९.२०१९.
२) जिल्हा न्यायालय, अमरावती यांचे पत्र क्र.ब-४(आस्था)/१५१/२०२०, दि.१७.०१.२०२०.
३) जिल्हा न्यायालय, नागपूर यांचे पत्र क्र.बी-४(१०)/३७८/२०२०, दि.३०.०१.२०२०.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२०.

**प्रस्तावना :-**

नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई आणि जिल्हा न्यायालय, नागपूर, अमरावती व पुणे येथील केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) न्यायालयांच्या ६० अस्थायी पदांना संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये दि.२९.०२.२०२० पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. संदर्भ क्र २ ते ४ च्या पत्रान्वये सदर न्यायालयातील अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ देण्याची शासनास विनंती केलेली आहे. संदर्भ क्र. ४ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार सदर अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) यांनी दाखल केलेली प्रकरणे चालविण्यासाठी मुंबई येथे ७, व नागपूर येथे ३, पुणे व अमरावती येथे प्रत्येकी १ याप्रमाणे स्थापन केलेल्या एकूण १२ विशेष न्यायालयांच्या आस्थापनेवरील ६० अस्थायी पदांना (परिशिष्ट अ) या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२० ते दि.३१.०८.२०२० पर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. या प्रस्तावाअंतर्गत येणारा खर्च मागणी क्रमांक जे-१, २०१४-न्यायदान (दत्तमत) १०५-(१)(१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधिश, संकेतांक क्रमांक (२०१४ ०१६३) ०१ वेतन आणि मागणी क्रमांक जे-१, २०१४, न्यायदान, (दत्तमत) १०५ दिवाणी व सत्र न्यायालये (०६)(०१) केंद्रीय गुन्हे अन्वेषण (सी.बी.आय.) विशेष न्यायालय (२०१४ ०४६८) या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ या वित्तीय वर्षासाठी मंजूर होणा-या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१२.०२.२०२० द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१२१५५६४८३३१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uday Balkrishna Shukla

Digitally signed by Uday Balkrishna Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=25569b2f94f1c4543dd14cfd7554a74f343a754d96291ae76706a168af42cab3, serialNumber=7b8594c3caa0542cc27f913c48e1f9c0084209e339cce7fd9de455fe24a26bbb, cn=Uday Balkrishna Shukla
Date: 2020.03.12 15:59:23 +05'30'

**( उदय बा. शुक्ल )**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

१. महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
२. प्रबंधक (निरीक्षणे), उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
३. प्रमुख न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
४. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, पुणे, नागपूर व अमरावती,
५. महालेखापाल-एक (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
६. महालेखापाल-दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नागपूर व अमरावती,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०. वित्त विभाग/व्यय-५
११. विधि व न्याय विभाग कार्यासन-२३, २४ व २५,
१२. निवडनस्ती.

**परिशिष्ट "अ"**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या | पदे निर्माण करण्यात आलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १ | न्यायाधीश | ३ | विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. सीआरसी १०९८/७५०/(६०)/९, दिनांक २२.१०.२००७. |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ३ | -"- |
| ३ | शिरस्तेदार | ३ | -"- |
| ४ | लिपिक-टंकलेखक | ३ | -"- |
| ५ | शिपाई | ३ | -"- |
| ६ | न्यायाधीश | ६ | विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र. सीआरसी १००९/प्र.क्र.८०/का-९, दि.१६.११.२०१० |
| ७ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ६ | -"- |
| ८ | शिरस्तेदार | ६ | -"- |
| ९ | लिपिक-टंकलेखक | ६ | -"- |
| १० | शिपाई | ६ | -"- |
| ११ | न्यायाधीश | ३ | विधि व न्याय विभाग, शासन निर्णय विशेन्या १३१३/प्र.क्र.६४/का-९, दि ०२.०५.२०१३ |
| १२ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | ३ | -"- |
| १३ | शिरस्तेदार | ३ | -"- |
| १४ | लिपिक-टंकलेखक | ३ | -"- |
| १५ | शिपाई | ३ | -"- |
| **एकूण पदे** | | ६० | |